**धर्मादाय संघटनेंतर्गत भूतपुर्व दुय्यम निवडमंडळाच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोट्यातील रिक्त पदे भरण्याकरीता टीसीएस कंपनीमार्फत स्पर्धा परीक्षा आयोजित करण्याकरीता उमेदवारांकडून प्राप्त होणारे परीक्षा शुल्क जमा करण्यासाठी चालू खाते उघडण्यास मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-सीएचए-२०२३/प्र.क्र.१२२/कार्या-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १७ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ :** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. प्रानिमं १२२/प्र.क्र.१३६/१३-अ, दि.२१.११.२०२२

२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. इएसटी २०२३/प्र.क्र.५१/कार्या-२, दि.३१.०५.२०२३

३) धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे पत्र क्र. आस्थापना/लेखा-१/३६४८/२०२३, दि.१४.०७.२०२३

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयांन्वये, भूतपूर्व दुय्यम निवडमंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट ब (अराजपत्रित), गट क व गट ड या संवर्गातील पदे सरळसेवेने भरण्यासाठी ऑनलाईन पद्धतीने (Computer Programme Based Test/ Examination) स्पर्धा परीक्षा प्रक्रिया राबविण्याच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयांन्वये, स्पर्धा परीक्षेकरीता उमेदवारांकडून प्राप्त होणारे शुल्क जमा करण्यासाठी वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार बँकेची निवड करुन एक स्वतंत्र बँक खाते उघडण्याबाबत सूचित केले आहे.

त्यानुसार, संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये या विभागाच्या अधिपत्याखालील धर्मादाय संघटनेंतर्गत कार्यालयांतील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील नामनिर्देशनाच्या कोट्यातील रिक्त पदे सरळसेवेने भरण्यासाठी टाटा कन्सल्टन्सी सर्विसेस लिमिटेड या कंपनीमार्फत स्पर्धा परीक्षा आयोजित करण्याकरीता उमेदवारांकडून प्राप्त होणारे परीक्षा शुल्क जमा करण्यासाठी अध्यक्ष, राज्यस्तरीय निवड समिती तथा धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे नावे स्टेट बँक ऑफ इंडीया, निरलॉन हाऊस, डॉ. ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई या शाखेमध्ये चालू खाते उघडण्यास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. त्यानुषंगाने कार्यवाही करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

याद्वारे धर्मादाय संघटनेंतर्गत कार्यालयांतील भूतपूर्व दुय्यम निवडमंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) नामनिर्देशनाच्या कोट्यातील रिक्त पदे सरळसेवेने भरण्यासाठी टाटा कन्सल्टन्सी सर्विसेस लिमिटेड या कंपनीमार्फत स्पर्धा परीक्षा आयोजित करण्याकरीता उमेदवारांकडून प्राप्त होणारे परीक्षा शुल्क जमा करण्यासाठी अध्यक्ष, राज्यस्तरीय निवड समिती तथा

धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे नावे स्टेट बँक ऑफ इंडीया, निरलॉन हाऊस, डॉ. ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई या शाखेमध्ये चालू खाते उघडण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता येत आहे,-

१) धर्मादाय संघटनेंतर्गत उघडण्यात येणाऱ्या चालू खात्याचा वापर केवळ टीसीएस कंपनीमार्फत आयोजित स्पर्धा परिक्षेसंदर्भात उमेदवारांकडून प्राप्त होणा-या परीक्षा शुल्काची रक्कम जमा करण्याकरिताच करण्यात यावा.

२) सदर बँक खात्यातील अखर्चित रकमा शासनाकडे समायोजित करणे आवश्यक राहील.

३) सदर बँक खात्यातील व्यवहाराचे मासिक / तिमाही ताळमेळ करणे व लेखा परिक्षण अनिवार्य राहील.

४) सदर बँक खात्यात दीर्घकाळ निधी विनावापर पडून राहणार नाही या दृष्टीने तात्काळ विनियोगासाठी आवश्यक असेल, त्याचवेळी कोषागारातून निधी आहरीत करण्यात यावा.

५) सदर बँक खाते बंद करण्यात आल्यास त्यामधील शिल्लक रकमेचा ताळमेळ घेऊन शिल्लक अखर्चित रक्कम योग्य त्या शासन लेखाशिर्षाखाली तात्काळ जमा करावी.

६) वित्तिय औचित्याच्या सूत्राचे पालन व्हावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपरिक संदर्भ क्र. अनौसं-१९७/२३/कोप्र.५, दि.०२.०८.२०२३ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०८१७१२२४२५३५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b46463 11d3a20fa0e8638f40554d1f74d87b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46C6AAD763D6F6FE01CAEF299F7B F533D85983B1491695AAAE025643F38D12D4, cn=MANISHA ANIL KADAM
Date: 2023.08.17 12:25:32 +05'30'

**(मनिषा कदम)**
**सहायक सॉलिसिटर नि उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,
२. मा. उप मुख्यमंत्री (विधि व न्याय) यांचे सचिव,
३. महालेखापाल, लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
४. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. लेखा संचालक, धर्मादाय आयुक्त कार्यालय, मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. वित्त विभाग (कोषा प्रशासन-५), मंत्रालय, मुंबई,
८. विधि व न्याय विभाग (कार्यासन २१), मंत्रालय, मुंबई,
९. निवड नस्ती(का-१).